रस्ता सुरक्षा निधीमधून करावयाच्या खर्चाच्या प्रस्तावांच्या कामांना मंजूर झालेला निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीआर-११२३/प्र.क्र.२२६/परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४.

**संदर्भ :-**
१) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. ०१ सप्टेंबर, २०१६.
२) शासन अधिसूचना क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. १७ ऑक्टोबर, २०१६.
३) रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समितीच्या दि.१२.०५.२०२१,दि.२६.०७.२०२१, दि.२२.१२.२०२१, दि.१२.०९.२०२२,दि.०२.०५.२०२३ व दि.१८.१०.२०२३ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त.
४) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२, दि.३१ मे, २०२२,दि.१५.०२.२०२३ व दि.३०.०३.२०२३
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल,२०२३.
६) परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.पआका/रस्ता सुरक्षा निधी/न.क्र.९८(२)/ २०१६/२०२३/जा.क्र.७६५१,दि.०३.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.२९५/२०१५ यामध्ये रस्ता सुरक्षा विषयक बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन मा.सर्वोच्च न्यायालयास अहवाल सादर करण्यासाठी रस्ता सुरक्षा समितीची स्थापना केली आहे. सदर समितीने रस्ता सुरक्षाविषयक कामकाजासाठी स्वतंत्रपणे रस्ता सुरक्षा निधी निर्माण करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्यानुसार रस्ता सुरक्षासंदर्भात विविध प्रकल्पांना मान्यता देण्याकरीता संदर्भाधिन क्र.१ येथील दि.०१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. सदर समितीने वेळोवेळी मान्यता दिलेल्या प्रस्तावांमधील कामांना निधी वितरण करण्याच्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पात लेखाशीर्ष २०४१०५६४ - ३२ अंशदाने, रस्ता सुरक्षा निधी या उद्दिष्टाकरिता रु.४४८.०० कोटी अनुदानाची मागणी करण्यात आली होती. प्रत्यक्षात रु.५०.०० कोटी एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. त्यामुळे, आवश्यकतेनुसार रु. १००.०० कोटी इतक्या अधिकच्या रकमेची पुरवणी मागणी वित्त विभागास सादर करण्यात आली होती. सदर पुरवणी मागणी मान्य करण्यात आली आहे. सदर पुरवणी मागणीव्दारे मंजूर केलेल्या निधीपैकी रु.५०.०० कोटी एवढा निधी बीम्स प्रणालीवर वित्त विभागाने वितरीत केला आहे.

२. मागणी क्रमांक बी-३, मुख्यलेखाशिर्ष, २०४१ ०५६४ - ३२ अंशदाने रस्ता सुरक्षा निधी अंतर्गत पुरवणी मागणीव्दारे मंजूर रु.५०.०० कोटी आणि शिल्लक रु.१३.०० लक्ष निधी पुढील बाबींकरिता वितरीत करण्यास हरकत नसावी.

| अ. क्र. | विभाग / कार्यालय | बाब / प्रस्तावाचे वर्णन | वितरीत करावयाची रक्कम (रुपये कोटी) |
|---|---|---|---|
| १ | परिवहन विभाग | २० वाहन निरीक्षण व परिक्षण केंद्र (I & C Center) उभारणी करण्याकरीता मान्यता देणे बाबत.<br>(सदर केंद्रे राज्यातील पुढील ठिकाणी प्रस्तावित आहे. अहमदनगर, अकलूज, भंडारा, धुळे, गडचिरोली, गोंदिया, हिंगोली, जळगाव, जालना, कराड, मालेगाव, नागपूर (पूर्व), नवी मुंबई, उस्मानाबाद, पेण, सांगली, सिंधूदुर्ग, वसई, वर्धा व यवतमाळ) **(प्रकल्पाची एकूण रक्कम रु.३७२.०० कोटी)** | २५.१३ |
| २ | परिवहन विभाग | राज्यातील १६ परिवहन कार्यालयामध्ये CIRT पुणे यांच्यामार्फत १६ स्वयंचलित चलन चाचणी पथ (Automated Driving Test Track) उभारणीकरीता रु.१३६.५३ कोटी (कराव्यतिरिक्त म्हणजेच) रु.१६१.१८ कोटी (१८ टक्के जीएसटीसह) इतका निधी रस्ता सुरक्षा निधीमधून उपलब्ध करुन देण्यास मान्यता मिळणेबाबत. | २५.०० |
| | | **एकूण रक्कम (रुपये कोटी)** | **५०.१३** |

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५२/२०२४/व्यय-८, दिनांक १२.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१२१०२८१२३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAGAR DHONDIRAM PATIL

Digitally signed by SAGAR DHONDIRAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b303a302c4285dac740589e585048fce69e2ef2ade0799db990bcdca3ead8311, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0255578456B2F5C05285C172A57976163858393ED219ED428FAD29A0BBE29DEE, cn=SAGAR DHONDIRAM PATIL
Date: 2024.03.14 16:58:21 +05'30'

**( सागर धों. पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
११) वित्त विभाग (व्यय ८/कोषा ५/ अर्थसंकल्प १०) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) गृह विभाग (बीयुडी १/बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती/परि-२.